**राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रकरणी मोबदल्याच्या रकमेची परिगणना करताना अवलंबावयाच्या कार्यपद्धतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. एलक्युएन १२/२०१३/प्र.क्र.१९० (भाग-१५)/अ-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक:- ०६ ऑक्टोबर, २०२१.

वाचा :-१) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र. एलक्युएन १२/२०१३/प्र.क्र.१९० (भाग-१५) / अ-२, दि.२६.५.२०१५, दि.७.१०.२०१५, दि.२४.४.२०१७, दि.२९.८.२०१७ आणि दि.२४.११.२०१७

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-०३/२०१८/प्र.क्र.४३/अ-२, दि.१३ ऑगस्ट, २०१८

३) शासन शुद्धीपत्रक क्र.संकीर्ण-०३/२०१८/प्र.क्र.४३/अ-२, दि.१० सप्टेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र.एलक्युएन १२/२०१३/प्र.क्र.१९०(भाग-१५)/अ-२, दि.०५.१०.२०२१ निर्गमित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रकरणी मोबदल्याच्या रकमेची परिगणना करताना अवलंबावयाच्या कार्यपद्धतीबाबत निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार सर्वंकष विचारविनिमय करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रकरणी मोबदल्याच्या रकमेची परिगणना करताना खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात येत आहेत-

**१.१** शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र. एलक्युएन १२/२०१३/प्र.क्र. १९० (भाग-१५) /अ-२, दि.०५.१०.२०२१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे, राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रकरणी मोबदल्याच्या रकमेची परिगणना करताना गुणक घटक १.०० राहील.

**१.२** महामार्ग प्रकल्पाकरीता भूसंपादन करताना एकसमान निकष लागू करण्याच्या दृष्टीने, महामार्ग सन्मुख जमिनीचे मूल्यांकन करताना नोंदणी महानिरीक्षक यांचेकडून दर वर्षी जाहीर होणाऱ्या मार्गदर्शक सूचना क्र. २९ (ब) मधील तक्त्यात अ.क्र. २ येथे नमूद केलेल्या टप्पा पद्धतीच्या धर्तीवर जमिनीच्या निर्धारीत बाजार दर मूल्यांकनात २०% कपात करण्यात येईल.

**१.३** महामार्ग सन्मुख असलेले जमिनीचे मूल्यांकन करताना उक्त नमूद १.१ व.१.२ मधील प्रस्ताव विचारात घेतल्याने ग्रामीण व क वर्ग नगरपालिका क्षेत्र आणि नगरपंचायत क्षेत्रात मिळणाऱ्या

मोबदल्यामध्ये तफावत राहणार नाही. त्यामुळे शासन निर्णय दिनांक १६.३.२०२० चा हेतू साध्य होत असल्याने तो रद्द करण्यात येत आहे.

**१.४** उपरोक्त नमूद मुद्दा क्र. **१.१** व **१.२** मध्ये नमूद सुधारणा संदर्भात शासन अधिसूचना दिनांक ०५.१०.२०२१ प्रकाशित झाल्याच्या दिनांकानंतर राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या ज्या भूसंपादन प्रकरणी ३ (A) ची अधिसूचना प्रकाशित होईल अशा प्रकल्पांना लागू करणे संयुक्तिक ठरेल. तथापि, प्रगतीपथावरील राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पाच्या भूसंपादन प्रकरणी सदर अधिसूचना दि.०५.१०.२०२१ लागू होणार नाही. शासन अधिसूचना दिनांक ०५.१०.२०२१ निर्गमित झाल्यानंतर ज्या राष्ट्रीय/ राज्य महामार्ग प्रकल्पांमध्ये पूर्वी भूसंपादनासाठी संपूर्ण प्रकल्पासाठी राष्ट्रीय महामार्ग अधिनियम, १९५६ च्या कलम ३ (A) व महाराष्ट्र महामार्ग अधिनियम,१९५५ मधील कलम १५ ची अधिसूचना निर्गमित केली होती व ती व्यपगत झाली असल्यास असे प्रकरण नवीन प्रकल्प म्हणून विषयांकित प्रकरणी पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११००६१७३०४६२२१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2021.10.06 17:33:43 +05'30'

**( संजय इंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१) मा.मंत्री (महसूल) / मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
३) विभागीय आयुक्त, सर्व
४) जिल्हाधिकारी, सर्व
५) आयुक्त, महानगरपालिका सर्व
६) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
७) व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ महाराष्ट्र
८) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ

१०) अतिरिक्त स्थायी समुपदेशी (Aadditional Standing Counsel), सरकारी वकील यांचे कार्यालय, महाराष्ट्र शासन, नवीन महाराष्ट्र सदन, कस्तुरबा गांधी मार्ग, नवी दिल्ली-१०० ००१

११) प्रादेशिक अधिकारी, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, मुंबई

१२) प्रादेशिक अधिकारी, भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, नागपूर

१३) सर्व भूसंपादन अधिकारी, महाराष्ट्र

१४) सर्व सहसचिव/उपसचित/अवर सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) निवड नस्ती (अ-२), मंत्रालय, मुंबई.